**स्वर्णजयंती ग्राम स्वरोजगार योजने अंतर्गत स्थापित स्वयंसहायता गटांची सर्वंकक्ष माहिती संगणकावर एकत्रित करण्यासाठी मेसर्स लिप्स् ॲन्ड बाऊन्डस्, पुणे या कंपनीने तयार केलेले सॉफ्टवेअर जिल्हा व तालुका स्तरावर स्थापीत करुन कार्यान्वित करण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन,
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय, क्रमांकः स्वग्रायो-२००९/प्र.क्र.१६८/योजना-३,
दिनांक : ८ फेब्रुवारी, २०१०.

**<u>शासन निर्णय</u>** :-

राज्यात दारिद्रय निर्मूलनासाठी स्वर्ण जयंती ग्राम स्वरोजगार ही ७५% केंद्र पुरस्कृत योजना सन १९९९ पासून राबविण्यात येते. या योजनेमध्ये गटसमुहाला प्राधान्य देण्यात आले आहे. सन १९९९ पासून डिसेंबर, २०१० पर्यंत या योजने अंतर्गत एकूण २,२५,१४० स्वयंसहायता गट स्थापन झाले असून त्यातील ६१,३२५ गटांनी आपले उपक्रम सुरु केले आहेत. या एकूण गटामध्ये १,८३,७८० गट महिलांचे असून त्यातील ५१,९१८ महिला गटांनी उपक्रम सुरु केले आहेत. या योजने अंतर्गत अद्यापी २,२५,१११ गट स्थापन करण्याचे शासनाचे उद्दीष्ट आहे. राज्यभर स्थापन झालेल्या गटांची मोठी संख्या विचारात घेता, या गटांची सर्वंकषअद्ययावत माहिती एकेठिकाणी उपलब्ध असणे आवश्यक झाले आहे. सदर आवश्यकता खालील कारणांमुळे प्रकर्षाने जाणवते :-

क) स्वर्ण जयंती ग्राम स्वरोजगार योजने अंतर्गत सहाय्यीत बचत गटांची सूची करण्याबाबत केंद्र शासनाच्या ग्रामीण विकास मंत्रालय, कृषि भवन, नवी दिल्ली यांनी विहित नमुन्यामध्ये राज्य शासनाकडून माहिती मागविली आहे. सदर माहिती विस्तृत स्वरुपात असून ती एकत्रितरित्या असणे अत्यंत उपयुक्त आहे.

ख) स्वर्ण जयंती ग्राम स्वरोजगार योजने अंतर्गत स्थापित स्वयंसहायता गटाचे संघीकरण करण्याचा निर्णय शासनाने दिनांक ६ जुलै, २००९ च्या शासन निर्णयान्वये घेतला. या संघीकरणासाठी व संघीकरणाच्या बळकटीकरणासाठी स्वयंसहायता गटाबाबतची संपूर्ण एकत्रित माहिती तालुका, जिल्हा, विभाग व राज्यस्तरावर असणे आवश्यक आहे.

ग) आजमितीस राज्यात सुमारे २.२५ लक्ष इतके बचत गट केवळ स्वर्ण जयंती ग्राम स्वरोजगार योजने अंतर्गत कार्यरत असून अन्य विभाग व स्वयंसेवी संस्था यांनी स्थापन केलेल्या बचत गटांची एकत्रित संख्या सुमारे ४.५० लक्ष पर्यन्त आहे. याची संपूर्ण कागदोपत्री माहिती प्रचंड प्रमाणात होईल. त्यामुळे ही माहिती संगणकावर जमा करणे उपयुक्त राहील. जेणेकरुन त्यामध्ये वेळोवेळी सुधारणा करणे, माहिती अद्ययावत करणे शक्य होईल.

घ) स्वयंसहायता गटाच्या बळकटीकरणासाठी राज्याने स्वर्ण जयंती ग्राम स्वरोजगार योजने अंतर्गत स्थापित महिला स्वयंसहायता गटांना देण्यात येणा-या कर्जावर आकारले

जाणा-या व्याजाची ७% पर्यन्तची रक्कम शासनाकडून अदा करण्याचा निर्णय घेतला आहे. या योजनेसाठीही अशाप्रकारे स्वयंसहायता गटाची संपूर्ण माहिति जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेकडे असणे आवश्यक ठरते.

२. त्या अनुषंगाने याबाबत पुणे विभागातील पुणे, सांगली, सातारा, कोल्हापूर, सोलापूर या पाच जिल्ह्यांमध्ये स्वयंसहायता गटाची माहिती एकत्रित करण्यासाठी विभागीय आयुक्तांचे स्तरावर सॉफ्टवेअर बसविण्याचा निर्णय घेतला. या सॉफ्टवेअरच्या वापराबाबत संबंधित जिल्ह्यांकडून अनुकूल अभिप्राय प्राप्त झाले.

३. त्यादृष्टीने अशाप्रकारचे सॉफ्टवेअर खरेदी करुन अन्य विभागातील जिल्ह्यांनाही पुरविण्याबाबत विचार केला असता सदर सॉफ्टवेअर मेसर्स लिप्स् ॲन्ड बाऊन्डस्, पुणे या कंपनीने तयार केले असून विभागीय आयुक्त, पुणे यांनी दिलेल्या आदेशानुसार जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, सोलापूर यांनी सॉफ्टवेअर खरेदीच्या कार्यप्रणालीनुसार निविदा मागवून या कंपनीशी खरेदी करण्याचा करार केला व त्यानुसार सदर सॉफ्टवेअर पुणे विभागातील पाचही जिल्ह्यात कार्यान्वित आहे.

४. राज्यातील अन्य जिल्हयांमध्ये सदर सॉफ्टवेअर पुरविण्याच्या दृष्टीने शासन स्तरावर व यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे (यशदा) येथे सॉफ्टवेअरचे सादरीकरण झाले. या सादरीकरणात झालेल्या चर्चेनुसार सदर सॉफ्टवेअरमध्ये अधिक सुधारणा करुन या मेसर्स लिप्स् ॲन्ड बाऊन्डस्, पुणे कंपनीकडून सॉफ्टवेअर खरेदी करण्याचा तसेच सोलापूर जिल्ह्यातील निविदा प्रक्रिया मागवून किंमत अंतिम करण्यात आली. पुणे विभागातील ५ जिल्हयात हे सॉप-टवेअर वापरण्यात येत आहे. राज्यात एकसूत्रता रहावी या हेतूने त्याच खाली दर्शविलेल्या दराने खरेदी करुन कोकण, नाशिक, औरंगाबाद, अमरावती व नागपूर या विभागातील एकूण २८ जिल्ह्यानी व २९६ तालुक्यांनी वापरात आणावे असा निर्णय घेण्यात आलाः-

| **अनुक्रमांक** | **बाब** | **किंमत (रुपये)** | **क्षेत्र** |
|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** |
| १ | बचत गट संगणक प्रणालीची मूळ किंमत | ३०००००/- | प्रति जिल्हा |
| २ | एक वर्षासाठी ऑनसाईट सह्हाय किंमत | १५००००/- | प्रति जिल्हा |
| ३ | बचत गट संगणक प्रणालीची वेब स्पेसची किंमत | ३००००/- | प्रति जिल्हा प्रतिवर्षी |
| ४ | बचत गट संगणक प्रणालीच्या इन्स्टॉलेशनची किंमत | २५००/- | प्रति तालुका |
| ५ | डेटा एन्ट्री किंमत | | |
| ५ अ | बचत गट फॉर्म डेटा एन्ट्री | ६/- | प्रती गट |
| ५ ब | बचत गट सभासद डेटा एन्ट्री | ४/- | प्रती सभासद |
| * | **VAT मूळ किंमती व्यतिरिक्त लागू** | | |
| * | **सेवाकर मूळ किंमती व्यतिरिक्त लागू** | | |

५. सदर निर्णयानुसार पुणे विभागातील जिल्हे वगळता, राज्यातील उर्वरित जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांना खालीलप्रमाणे आदेश देण्यात येत आहेत :-

(अ) राज्यातील पुणे विभाग वगळता, कोकण, नाशिक, औरंगाबाद, अमरावती व नागपूर या विभागातील एकूण २८ जिल्हे व २९६ तालुक्यांना प्रत्येक जिल्हयास रु.३,००,०००/- या दराने सदर सॉफ्टवेअर मेसर्स लिप्स् अॅन्ड बाऊन्डस्, पुणे या कंपनीकडून खरेदी करुन कार्यान्वित करण्याची कार्यवाही जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांनी करावी.

(ब) जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांनी सॉफ्टवेअर बसविण्याच्या खर्चासाठी रु.२५००/-, संबंधित जिल्ह्यातील तालुक्याच्या संगणक प्रणाली बसविण्यासाठी भेटीस, संस्थेस अदा करण्यात यावेत.

(क) जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांनी सॉफ्टवेअर बसविणे आणि प्रशिक्षण +एक वर्ष कालावधीसाठी ऑनसाईट सपोर्ट या बाबीसाठी रु.१,५०,०००/- याप्रमाणे संस्थेस अदा करण्याची कार्यवाही करावी.

(ड) स्वयंसहायता गटाची माहिती प्रथमत: सॉफ्टवेअरमध्ये भरण्यासाठी रु.६.०० व प्रत्येक सदस्याची माहिती प्रती सदस्य रु.४.०० याप्रमाणे प्रत्येक स्वयंसहायता गटाची व त्यातील सदस्यांची माहिती संस्थेकडून भरुन घ्यावी. सदर कार्यवाही खालील कालमर्यादेत करण्यात यावी :-

(१) सोबतच्या **परिशिष्ट (क)** मध्ये स्वयंसहायता गटाची माहिती १ ते दिड महिन्याच्या कालावधीत भरुन कंपनीकडे देण्यात यावी. (श्री. भूषण डेरे, मुख्य कार्यकारी अधिकारी, L-४१०, रम्य नगरी, बिबवेवाडी, पुणे. ४११ ०३७-दूरध्वनी ०२०-६४०१८०५५/२४२१७१४८/९४२२०१६७१८)

(२) कंपनीने डाटा प्राप्त होईल तसतसा संगणकावर भरावा. संपूर्ण डाटा संगणकावर भरण्याची कार्यवाही ४ महिन्यात पूर्ण करावी.

माहिती भरुन पूर्ण झाल्यानंतर त्यापुढील माहितीचे वेळोवेळी अद्ययावतीकरण जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेकडून करण्यात येईल.

(इ) वेबस्पेस, डोमेन नेम व मराठी वेब फॉन्ट यासाठी प्रती जिल्हा प्रती वर्ष रु.३०,०००/- प्रमाणे संस्थेने दर आकारला आहे. सदर रक्कम जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेने अदा करावी.

(फ) यासाठी लागणारा खर्च जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांमार्फत स्वर्ण जयंती ग्राम स्वरोजगार योजनेतील मुलभूत सुविधांसाठी असणा-या निधीतून भागविण्यात यावा.

६. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा अध्यक्ष कार्यकारी समिती, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा व प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा यांनी मेसर्स लिप्स् ॲन्ड बाऊन्डस्, पुणे या कंपनीच्या पदाधिकाऱ्यां समवेत करावयाच्या करारनाम्याचा नमुना सोबत जोडला आहे. सदर करारनामा करुन त्यानुसार कार्यवाही करण्यात यावी.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१००२०८१४३२४६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**सोबत : करारनामा व त्यासोबत**
**परिशिष्ट (अ),(ब),(क),व (ड).**

( सुधीर ठाकरे )
सचिव, ग्राम विकास व पंचायत राज

प्रति,

१) सर्व विभागीय आयुक्त.
२) सर्व जिल्हाधिकारी.
३) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा अध्यक्ष, कार्यकारी समिती, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा.
४) महालेखापाल, (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
५) महालेखापाल, (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर
६) सर्व उप आयुक्त (विकास), विभागीय आयुक्त यांचे कार्यालय.
७) सर्व गटविकास अधिकारी, पंचायत समिती.
८) सर्व प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा.

सदर करारनामा  लिप्स ॲण्ड बाऊंडस, एल- ४१०, रम्यनगरी, बिबवेवाडी, पुणे- ४११०३७ येथे नोंदणीक्रुत कार्यालय असणारी संस्था, ज्याचे श्री. भुषण सुरेश डेरे हे मुख्य कार्यकारी अधिकारी आहेत, व येथुन पुढे ज्याचा उल्लेख पहिली बाजु असा केला आहे, (जर संदर्भाचा विसंगत नसेल तर याचा अर्थ व यामध्ये त्याचे कायदेशीर वारस, एकझीक्युटर, आणि प्रतिनिधी असा आहे.)

**आणि**

कार्यकारी अध्यक्ष, जिल्हा ग्रामिण विकास यंत्रणा तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, (जर संदर्भाचा विसंगत नसेल तर याचा अर्थ व यामध्ये त्याचे कायदेशीर वारस, एकझीक्युटर, आणि प्रतिनिधी असा आहे) ज्याचा उल्लेख येथुन पुढे दुसरी बाजु असा आहे.

**लिप्स ॲण्ड बाऊंडसने (ज्याचा उल्लेख येथुन पुढे फर्म असा केला आहे) बचतगट माहिती व्यवस्थापन पध्दत नावाची वेब आधारीत संगणक प्रणाली विकसित केली आहे. हि संगणक प्रणाली  जिल्हा ग्रामिण विकास यंत्रणेच्या गरजेनुसार विकसित केली आहे.**

**वरिल दोन्ही बाजूंकडून खालील प्रमाणे एकमताने करार करण्यात येत आहे.**

१. खाली दिल्याप्रमाणे महाराष्ट्र राज्य शासनाने संगणक प्रणालीची किंमत ठरवून दिली आहे.

| क्र. | विवरण | किंमत (रू.) | एकक |
|---|---|---|---|
| १ | **बचत गट संगणक प्रणालीची मुळ किंमत** | ३,००,०००/- | प्रति जिल्हा |
| २ | **एक वर्षासाठी ऑनसाईट सहाय्य किंमत** | १,५०,०००/- | प्रति जिल्हा |
| ३ | **बचत गट संगणक प्रणालीसाठी वेब स्पेस ची किंमत** | ३०,०००/- | प्रति जिल्हा प्रति वर्षी |
| ४ | **बचत गट संगणक प्रणालीच्या इन्स्टॉलेशनची किंमत** | २,५००/- | प्रति तालुका |
| ५ | डेटा एन्ट्री किंमतः- | | |
| ५ अ | **बचत गट फॉर्म डेटा एन्ट्री** | ६/- | प्रति गट |
| ५ ब | **बचत गट सभासद डेटा एन्ट्री** | ४/- | प्रति सभासद |
| **विक्री कर** (VAT): अतिरिक्त, मुळ किंमती व्यतिरिक्त लागू. | | | |
| **सेवा कर** (Service Tax): अतिरिक्त, मुळ किंमती व्यतिरिक्त लागू. | | | |
| | | | |

२. देयक ( खरेदी ) अटी व शर्ती :
लिप्स ॲन्ड बाउंड्स सॉफ्टवेअर कंपनीला देयक खालील प्रमाणे देण्यात येईल.

अ) रुपये ३,००,०००/- ( अक्षरी रूपये तीन लक्ष फक्त ) संगणक प्रणालीची किंमत. संगणक प्रणाली इन्टॉलेशन सी.डी. जिल्हा ग्रामिण विकास यंत्रणेला सुपूर्त केल्याबद्द्ल (कार्यारंभ आदेशाबरोबर).

ब) रुपये -----------( रुपये २,५००/- X एकुण तालुके ) संगणक प्रणाली स्थापित करणे, प्रति तालुका ( पंचायत समिती ) व रुपये ३०,०००/- (रूपये तीस हजार) व्हेब स्पेस किंमत. जिल्ह्यातील सर्व तालुक्यांमध्ये संगणक प्रणाली स्थापित (Install) केल्यानंतर.

क) रुपये ------------( ६/- (सहा) X जिल्ह्यातील एकुण बचत गट संख्या ). डेटा एन्ट्री किंमत. डेटा एन्ट्री चे काम पुर्ण झाल्या नंतर.

ड) रुपये -------------( ४/- (चार) X जिल्ह्यातील एकुण बचतगट सभासद संख्या ) डेटा एन्ट्री चे काम पुर्ण झाल्यानंतर.

इ) देखभाल खर्च (support charges) १,५०,०००/- (अक्षरी रूपये एक लाख पन्नास हजार फक्त) दोन समान टप्यांमध्ये, प्रत्येक सहामाही सुरू होण्यापुर्वी. कार्यारंभ आदेशाच्या तारखेनुसार देण्यात येईल.
फ) देयक हे धनाकर्षाच्या (Demand Draft) स्वरुपात लिप्स ॲण्ड बाऊंडस् यांच्या नावे पुणे येथे देय स्वरुपात काढावे.
ग) वरील सर्व देयके लागु असलेले कर अतिरिक्त मिळुन काढण्यात यावीत.

३. परीशिष्ट अ प्रमाणे जिल्हा ग्रामिण विकास यंत्रणा संगणक प्रणालीसाठी आवश्यक Hardware व Software ची पुर्तता करेल.

४. संगणक प्रणाली कार्यान्वित व देखभाल करण्यासाठीची पध्दती परीशिष्ट ब मध्ये नमुद केलेली आहे. जिल्हा ग्रामिण विकास यंत्रणा व फर्म यांच्या मार्फत त्या पध्दतीचा अवलंब केला जाईल.

५. परीशिष्ट क मध्ये दिलेल्या नमुना फॉर्म मध्ये बचत गटांची माहिती संकलनाचे काम जिल्हा ग्रामिण विकास यंत्रणा तातडीने सुरु करेल, व व्यवस्थित भरलेले फॉर्म महाराष्ट्र शासनाने निर्धारित केलेल्या मुदतीत `फर्म` कडे सुपूर्त करेल. फॉर्मची संख्या जास्त असल्याने जिल्हा ग्रामिण विकास यंत्रणा फॉर्म छापुन घेऊन त्याचे संबंधीत कर्मचा-यांकडे वाटप करु शकते. नंतर रोजच्या वापरात ( मासिक माहिती भरणेसाठी ) फॉर्म महाराष्ट्र शासनाकडुन दिला जाईल, व त्या प्रमाणे जिल्हा ग्रामिण विकास यंत्रणे कडून संगणक प्रणालीचा वापर चालु राहील.

६. वेबसाईटवर प्रकाशित करण्याची माहिती जिल्हा ग्रामिण विकास यंत्रणेने तयार करुन Electronic Format उदा. MS word, .jpg, .gif मध्ये CD द्वारे फर्म कडे सुपुर्त करावेत. यामुळे वेबसाईट त्वरेने व बिनचुक तयार होईल, फर्म वर वेबसाईट बांधणी व उभारणीची जबाबदारी असेल.

७. `फर्म` संगणक प्रणालीची Installation CD जिल्हा ग्रामिण विकास यंत्रणेला त्यांच्या जिल्ह्यासाठी वापराच्या अधिकारांसहित सुपूर्त करेल. व त्याबद्द्ल जिल्हा ग्रामिण विकास यंत्रणा संगणक प्रणाली खरेदीचे देयक अदा करेल.

८. वरील उल्लेखित संगणक प्रणाली व पध्दती ही जिल्हा ग्रामिण विकास यंत्रणेच्या केवळ स्वर्णजयंती ग्राम स्वरोजगार यंत्रणेसाठी लागु आहे.

९. या संपुर्ण प्रक्रियेमध्ये जिल्हा ग्रामिण विकास यंत्रणा व फर्मची भूमिका व जबाबदा-या परीशिष्ट ड मध्ये नमुद केल्याप्रमाणे राहतील.

१०. परीशिष्ट ब मध्ये नमुद केल्याप्रमाणे, प्रशिक्षण कार्यक्रमादरम्यान फर्मकडून केवळ प्रशिक्षक पुरविले जातील. प्रशिक्षणासाठी आवश्यक साधन सामग्री व इतर व्यवस्था जिल्हा ग्रामिण विकास यंत्रणेकडून केली जाईल.

११. महाराष्ट्र शासनाकडुन दिलेल्या सुचनांप्रमाणे संगणक प्रणाली तयार करणे व अद्यावत ठेवणेची जबाबदारी फर्मची राहील, हा कालावधी जिल्हा ग्रामिण विकास यंत्रणेने दिलेल्या कार्यारंभ आदेशाच्या दिनांकापासुन एक वर्षाचा असेल.

१२. एक वर्षानंतर पुढील कालावधीसाठी वार्षिक देखभाल वा सुधारणा करण्यासाठी उभय पक्षांच्या अनुमतीने वार्षिक देखभाल करार ( Annual Maintenance Contract) करता येईल.

१३. देखभाल सेवा ही केवळ फर्मने दिलेल्या बचत ग़ट संगणक प्रणालीसाठीच लागू असेल.

१४. फर्म ची देखभाल सेवा ही प्रत्यक्ष संगणकामध्ये होणारे तांत्रिक बिघाड उदा. Hardware Failure, UPS, Modem, Internet Connection failure अथवा Operating system Corrupt होणे यासाठी लागू नाही. जिल्हा ग्रामिण विकास यंत्रणा अशा समस्येसाठी इतर व्यक्ती अथवा संस्था नेमु शकते.

१५. बचत गट संगणक प्रणालीमध्येच Database चा Backup घेण्याची सुविधा उपलब्ध करुन दिली आहे, त्याद्वारे भरलेल्या माहितीचा ठराविक कालांतराने Backup घेणे ही जबाबदारी प्रणालीचा वापर करणा-या कर्मचा-याची आहे. जर अनवधानाने अथवा संगणक बिघाडामुळे संगणक प्रणाली मधील माहिती नाहीशी झाली तर त्यास फर्म जबाबदार राहणार नाही.

१६. संगणक प्रणाली स्थापित ( Install ) करण्याची कार्यवाही डेटा एन्ट्रीचे काम संपल्यानंतर त्वरेने करण्यात येईल. प्रशिक्षण व Installation चे वेळापत्रक जिल्हा ग्रामिण विकास यंत्रणा व फर्म दोघे मिळुन ठरवतील व त्याप्रमाणे कार्यवाही केली जाईल.

१७. जिल्हा ग्रामिण विकास यंत्रणेद्वारे संगणक प्रणाली ही फक्त -----------जिल्हयाच्या ---------- तालुक्यांमध्येच स्थापित करुन वापरली जाईल.

१८. उभयपक्षांमध्ये काही समस्या अथवा विवाद उदभवल्यास त्याचे निराकरण व मार्गदर्शन मा. सचिव ग्रामविकास विभाग, महाराष्ट्र शासन यांच्यामार्फत करण्यात येईल.

यांप्रकारे हा करारनामा खालील साक्षीदारांच्या उपस्थित दोन्ही पक्षांना लागू करण्यात आला व तो दोघांवर बंधनकारक राहील.

सही

-----------------------

**भुषण सुरेश डेरे / प्रतिनिधी**
**मुख्य कार्यकारी अधिकारी,**
**लिप्स ॲण्ड बाउंडस.**

साक्षीदार-

______________________

नाव :

पत्ता :

सही

-------------------------- --------------------------------

**कार्यकारी अध्यक्ष,**
**जिल्हा ग्रमिण विकास यंत्रणा तथा**
**मुख्य कार्यकारी अधिकारी,**
**जिल्हा परिषद.**

साक्षीदार-

______________________

नाव :

पत्ता :

# परिशिष्ट - अ

Minimum System Requirement for the SHG Database Management Software

**At Zilla Parishad**

**Hardware Requirement**
- Intel P IV or Equivalent
- Memory 1 GB
- Hard Disk space 700 MB
- Broadband Internet Connection / or Dial up Connection

**Software Requirement**
- Windows XP with SP3
- Microsoft.Net framework 3.5
- My SQL Server Ver. 5.0
- C-DAC ISM Marathi Software Font
- Updated latest Antivirus software

**At Taluka (Block)**

**Hardware Requirement**
- Intel P IV or Equivalent
- Memory 1 GB
- Hard Disk space 700 MB
- Broadband Internet Connection / or Dial up Connection

**Software Requirement**
- Windows XP with SP3
- Microsoft.Net framework 3.5
- My SQL Server Ver. 5.0
- C-DAC ISM Marathi Software Font
- Updated latest Antivirus software

# परिशिष्ट - ब

- बचतगट माहिती संगणक प्रणाली कार्यान्वित करणेसाठी आराखडा व नियोजन पध्दती.
- संगणक प्रणाली लागू करणे ( कार्यान्वित करणे )
- प्रशिक्षण पध्दत.
- संगणक प्रणाली कार्यान्वित / प्रस्थापित (Installation) करणे संबंधी.

संगणक प्रणाली खरेदी प्रक्रिया पुर्ण झाल्यानंतर योग्य तारिख ठरवुन संगणक प्रणाली खालील प्रमाणे कार्यान्वित करण्यात येईल.

१. संगणक प्रणाली सादरीकरण
   जिल्हा ग्रामिण विकास यंत्रणेच्या संबंधीत अधिकारी व कर्मचारी वर्गास संगणक प्रणालीचे सादरीकरण व माहिती गोळा करण्याचे फॉर्म संबंधात मार्गदर्शन.
२. फॉमचे वाटप.
३. माहिती भरलेले फॉर्म जमा करणे.
४. माहिती संगणक प्रणालीमध्ये भरणे व तपासणे.
५. वेबसाईट कार्यान्वित करणे.
६. वेबसाईटवर संबंधित जिल्हा ग्रामिण विकास यंत्रणेची प्रकाशीत करावयाची माहिती तयार करणे व त्याचे प्रकाशन.
७. संगणक प्रणालीचे जिल्हा व तालुकास्तरीय कर्मचा-यांसाठी प्रशिक्षण.
८. माहिती भरुन तयार असलेल्या संगणक प्रणालीची तालुका स्तरावर स्थापना व वेबसाईटवर उद्‌घाटन. ( Installation. )

१. संगणक प्रणाली सादरिकरण :
मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्यामार्फत ही संगणक प्रणाली वापरणारे कर्मचारी (जिल्हा व तालुका स्तर), नियुक्त करावेत. उदा. लिपिक, डेटा एन्ट्री कर्मचारी इ. संगणक प्रणाली लागू करण्याच्या प्रक्रियेमधील हि पहिली पायरी असेल. या प्रणालीचा भविष्यात वापर करणारे व त्याचा फायदा होणा-या अधिकारी व कर्मचारी ( जिल्हा व तालुक्स्तरावर) यांना संगणक प्रणालीची ओळख करुन देणे व त्यात सहभागी होण्यासाठी प्रेरीत करण्याचे काम केले जाईल, सादरीकरण्याच्यावेळी संगणक प्रणालीची कार्यपध्दती त्याचे फायदे व त्यासंबधीत कर्मचा-यांकडून असलेल्या अपेक्षा यांची माहीती दिली जाईल, तत्काळ आवश्यक बाब म्हणजे माहिती फॉर्ममध्ये योग्यप्रकारे भरणे व पाठवणे ही असेल.

२. फॉर्मचे वाटप :
महाराष्ट्र शासन प्रमाणित माहिती जमा करण्याचा फॉर्म G.R. सोबतच जोडलेला आहे. जिल्हा ग्रामिण विकास यंत्रणा आवश्यक तेवढे फॉर्म छपाई करुन संबंधित तालुकास्तरीय अधिकारी, कर्मचा-यांकडे सुपुर्त करावेत. हे काम संगणक प्रणाली सादरीकरणागोदर करण्यात यावे, यामुळे माहिती भरण्याची पध्दती, उपयोगिता व आवश्यकता सर्वांचे लक्षात येईल. माहिती भरुन फॉर्म जमा करण्याची अंतिम मुदत ----------राहिल व त्याची जबाबदारी संबंधित जिल्हा ग्रामिण विकास यंत्रणेवर राहिल.

३. माहिती जमा करणे :
फॉर्मचे वाटपानंतर तालुका स्तरावरुन, दिलेल्या मुदतीत, व्यवस्थित माहिती भरलेले फॉर्म्स जमा झाले पाहिजेत. फॉर्म्स भरणे कामी जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, संबंधीत NGO व ग्रामसेवकांचे सहकार्य घेऊ शकतात. तालुकानिहाय व्यवस्थित भरलेले फॉर्म्स जिल्हा कार्यालयात एकत्रीत करण्यात यावेत. सर्व तालुक्यांचे पूर्ण फॉर्म्स जमा झाल्यानंतर लिप्स ॲन्ड बाउंड्स या कंपनीकडे सुपुर्त करावेत. माहिती संगणक प्रणालीमध्ये भरणे ( सुरुवातीची, एकवेळ फक्त) जबाबदारी या संस्थेकडे देण्यात आली आहे. जमा झालेले सर्व फॉर्म्स हे एकाच वेळी लिप्स ॲन्ड बाउंड्स कंपनीला द्यावयाचे आहेत ( टप्या टप्याने नव्हे ). यामुळे योग्य पध्यतीने नियोजनबध्द माहिती भरण्याचे काम वेळेत होईल. भरलेल्या फॉर्म्स सोबत

खाली दिलेली माहीती लिप्स ॲन्ड बाउंड्सला देण्यात यावी.

अ) आपल्या जिल्यातील तालुक्यांची संख्या व नावे.
ब) तालुकानिहाय ग्रामपंचायतीची नावे ( अंतर्भूत गावे / वाडी, वस्तीसहीत.) हि यादी BPL Survey अथवा जनगणना, पुस्तक / CD मध्ये मिळू शकते. किंवा तयार करुन Word/Excel मध्ये द्यावी,
क) बचतगटांची खाती असलेल्या बॅका व त्यांच्या गावनिहाय शाखा यांची माहिती द्यावी.
ड) संबंधित NGO ची माहिती नाव, पत्ता, संबंधित व्यक्ती, फोन इ.
इ) संबंधित प्रशिक्षण संस्था व साधन व्यक्ती यांची माहिती नाव, पत्ता, संबंधित व्यक्ती, फोन इ.

वरील माहिती / याद्या MS Word/ Excel फॉर्म मध्येच द्यावी.

४. माहिती संगणक प्रणालीमध्ये भरणे व तपासणे:
हि जबाबदारी लिप्स ॲन्ड बाउंड्स कडे देण्यात आलेली आहे. माहिती गोळा करण्याची मोहिम झाल्यानंतर सर्व फॉर्म लिप्स ॲन्ड बाउंड्स एकाच वेळी त्यांच्या ताब्यात घेतील. माहिती भरण्याचे काम (डेटा एन्ट्री ) लिप्स ॲन्ड बाउंड्सच्या केंद्रावर केले जाईल. डेटा एन्ट्री झाल्यानंतर तालुकानिहाय डेटाबेस स्वतंत्र केला जाईल. सर्व डेटाबेसची मुख्य प्रत ( Master Copy) CD च्या स्वरुपात, जिल्हा ग्रामिण विकास यंत्रणेकडे सुपूर्त केली जाईल.

५. वेबसाईट कार्यान्वित करणे:
वरील संगणक प्रणालीसाठी पूर्णपणे स्वतंत्र वेबसाईटची आवश्यकता आहे. वरील माहिती जमा करणेच्या प्रक्रिये दरम्यान वेबसाईट उभारण्याचे काम लिप्स ॲन्ड बाउंड्स चालू करेल.

६. वेबसाईटवर संबंधित जिल्हा ग्रामिण विकास यंत्रणेची प्रकाशीत करावयाची माहिती तयार करणे व त्याचे प्रकाशन:
वेबसाईटवर प्रकाशीत करण्यासाठी जिल्हा ग्रामिण विकास यंत्रणेने खालील माहिती तयार करावी.
१) आपले नाविन्यपुर्ण प्रकल्प
२) चालू व नियोजित कार्यक्रम
३) बचत गटांच्या यशोगाथा
४) बचत गटांची उत्पादने, उत्पादन क्षमता, शक्य असल्यास फोटो सहीत.
५) जिल्हा परिषद अध्यक्ष, मुख्य कार्यकारी अध्यक्ष व प्रकल्प संचालक यांचे फोटो.
६) जिल्हा ग्रामिण विकास यंत्रणेचा पत्ता, दुरध्वनी, इ-मेल, फॅक्स इत्यादी.

७. संगणक प्रणालीचे जिल्हा व तालुकास्तरिय कर्मचा-यांसाठी प्रशिक्षण :
डेटा एन्ट्री व वेबसाईट कार्यान्वित झाल्यानंतर प्रशिक्षण कार्यक्रम खालील पध्दतीने घेतला जाईल. तत्पुर्वी मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्यामार्फत तालुकास्तरावरील लिपीक व टंकलेखक Operator नियुक्त केले जावेत व त्यांना या संगणक प्रणालीची रोजची नवीन माहिती अद्यावत करणे या संबंधीची जबाबदारी दिली जावी.

प्रशिक्षण दोन स्तरांवर देण्यात येईल.
i) जिल्हा स्तर- प्रमुख प्रशिक्षण
ii) तालुका स्तर- विशेष प्रशिक्षण

i) जिल्हा स्तर- प्रमुख प्रशिक्षण :
प्रशिक्षण कार्यक्रमात खालील व्यक्ती आवश्यक असतील.
मनुष्यबळ :
* एक प्रशिक्षित Programmer /system administrator ज्याला संगणकीय ज्ञान तसेच नेटवर्किंग व Installation चे ज्ञान असेल.
* दोन सुपर युजर्स ( Super Users) संगणक वापराचा अनुभव असणारे.

मनुष्यबळः तालुका स्तर विशेष प्रशिक्षण

* संगणक वापराची माहीती असणारे दोन कर्मचारी प्रति तालुका व संबंधित विस्तार अधिकारी.

**संगणक प्रणाली देखभाल व समस्या निवारण पध्दती - प्रशिक्षण :**

- जिल्हास्तरीय system Administrator / Programmer ला संगणक प्रणालीशी निगडीत किरकोळ शंका व समस्या निवारणासंबंधीत प्रशिक्षण देण्यात येईल, उदा. संगणक प्रणाली वापर, डेटाबेस बॅ्कअप, इनस्टॉलेशन इत्यादी.
- जिल्हास्तरीय दोन सुपर युजर्सना संगणक प्रणालीची सखोल माहिती व त्यांचे वापरण्या संबंधीत प्रशिक्षण देण्यात येईल. त्यांच्याकडे संगणक प्रणालीचे समन्वयन ( जिल्हास्तर व तालुकास्तर ) सोपवण्यात येईल. याद्वारे संगणक प्रणाली संबंधीत सर्वसाधारण शंकांचे ते निराकरण करु शकतील.
- तालुकास्तरीय नियुक्त कर्मचा-यांना डेटा फिडिंग संबंधीचे सखोल प्रशिक्षण दोन सत्रांमध्ये ( एक दिवस) देण्यात येईल. सुपर युजर्सना या प्रक्रियेत समाविष्ट करण्यात येईल. लिप्स ॲन्ड बाउंड्सची सपोर्ट टिम व सुपर युजर्स हे एकत्रितपणे कर्मचा-यांचे अभ्यास सत्र घेतील.
- जिल्हा ग्रामिण विकास यंत्रणेच्या अधिका-यांना संगणक प्रणालीतील अहवाल पाहणे व वेबसाईट यासंबंधीचे प्रशिक्षण दिले जाईल.

ii). विशेष प्रशिक्षण -तालुकास्तर :

जिल्हास्तरीय प्रमुख प्रशिक्षणानंतर लगेचच तालुकास्तरीय प्रशिक्षणाचा कार्यक्रम हाती घेतला जाईल. यामध्ये एकदिवसीय, प्रति तालुका पंचायत समितीमध्ये जाऊन त्यांच्या संगणकावर प्रशिक्षण दिले जाईल. तेथे नियुक्त दोन कर्मचारी व विस्तार अधिकारी यांना प्रत्यक्ष सखोल माहिती व अभ्यास (Practice) याचे आयोजन असेल.

८. माहिती भरुन तयार असलेल्या संगणक प्रणालीची तालुका स्तर व वेबसाईटवर स्थापना ( Installation ):

वरील प्रशिक्षण कार्यक्रमाबरोरच माहिती भरलेली संगणक प्रणाली तालुकास्तरावर स्थापीत करण्यात येईल व त्यावरच वापराचे प्रशिक्षण देण्यात येईल यासाठी अद्यावत व सुस्थितीतील संगणक ( याचे विवरण परिशिष्ट `अ` प्रमाणे ) तयार ठेवावा.

# परिशिष्ट - क

## स्वयं-सहाय्यता बचत गट माहिती फ़ॉर्म

प्रति गट एक फ़ॉर्म वापरावा

| बचत गटाची माहिती | |
|---|---|
| गटाचे नाव | |
| स्थापना दिनांक | |
| सद्यस्थिती | चालु / बंद / पुर्नस्थापित |
| चालु असल्यास | कार्यक्षम /अकार्यक्षम |
| बंद/पुर्नस्थापित दि. | (बंद अथवा पुर्नस्थापित असल्यास) |
| गटाचे आर्थिक वर्गीकरण | दारिद्र्य रेषेखालील गट / दारिद्र्य रेषेवरील गट / मिश्र गट |
| गटाचा प्रकार | पुरुष गट/ स्त्री गट / स्त्री-पुरुष गट |
| वाडी / वस्ती | |
| जिल्हा | |
| तालुका | |
| गावाचे नाव | |

| बचत व सभेबाबत माहिती | |
|---|---|
| प्रत्येकी मासिक बचत | |
| मासिक सभेचा दिनांक | |
| मासिक सभेची वेळ | |
| अंतर्गत कर्जवाटप | |
| अंतर्गत कर्जवाटप सुरु दिनांक | |
| अंतर्गत कर्जाचा व्याजदर | % (मासिक) |
| एकूण अंतर्गत कर्ज वाटप आजपर्यंतचे अंदाजे | |

| बचत गटाचे खाते असलेल्या वित्तीय संस्था / बँकेची माहिती | |
|---|---|
| वित्तीय संस्था /बँकेचे नाव | |
| शाखा | |
| बचत खाते क्रमांक | |
| बचत खाते सुरु दिनांक | |
| कॅश क्रेडिट खाते क्र. | |
| कॅश क्रेडिट खाते सुरु दिनांक | |

| सभासद वर्गीकरण | |
|---|---|
| स्त्री | |
| पुरुष | |
| एकूण | |
| परितक्त्या | |
| विधवा | |
| अपंग | |
| साक्षर | |
| निरक्षर | |
| दारिद्र्य रेषेखालील | अल्पसंख्यांक संख्या - / इतर - |
| दारिद्र्य रेषेवरील | अल्पसंख्यांक संख्या - / इतर - |
| अनुसुचित जाती | |
| अनुसुचित जमाती | |
| इतर मागास | |
| अल्पसंख्यांक | |
| वि.ज.भ.ज. | |
| इतर | |

| गटाशी निगडीत संस्था | |
|---|---|
| स्वयंसेवी संस्था नाव | |

| गटाचा संघ | |
|---|---|
| संघाचे नाव | |
| गटाचा संघातील खाते क्र. | |
| गटाचा संघातील खाते सुरु दि. | |
| गटाने संघाकडून कर्ज घेतलेला दिनांक/ रक्कम | |

| गटाचा विभाग | |
|---|---|
| विभागाचे नाव | |
| गटाचा विभागातील खाते क्र. | |
| गटाचा विभागातील खाते सुरु दिनांक | |
| गटाने विभागाकडून कर्ज घेतलेला दिनांक | |

| गटाचे मूल्यमापन ( ग्रेडेशन) | |
|---|---|
| पहिले मूल्यमापन दिनांक | |
| दुसरे मूल्यमापन दिनांक | |
| गटास रेशनचे दुकान मिळाले का? | होय / नाही |
| गटास राकेल विक्री परवाना मिळाला का? | होय / नाही |
| गट शालेय पोषण आहार (खिचडी) देतो का ? | होय / नाही |
| गट कोणत्या वस्तुचे उत्पादन करतो. | १. २. ३. |
| महिन्याला किती करू शकतो. क्षमता | किलो / लिटर / नग |

| इतर माहिती | |
|---|---|
| सामाजिक कार्यात सहभाग | संपुर्ण स्व्च्छता अभियान / संत गाडगेबाबा ग्रामस्वच्छता अभियान /व्यसनमुक्ती अभियान /शैक्षणिक गुणवत्ता विकास कार्यक्रम / म.फुले जल व भुमी संधारण अभियान |

## सभासदाची माहिती

प्रति सभासद स्वतंत्र फार्म भरावा - नंतर सर्व सभासद, कर्जाची माहिती व वरील गटाची माहिती यांचा एक संच करावा.

| | |
|---|---|
| गटाचे नाव | |
| तालुका | |
| गाव | |
| सभासद क्रमांक | |
| सभासदाचे नाव | |
| जन्मतारीख | |
| वडिलांचे/पतीचे नाव | |
| आडनाव | |
| दारिद्ररेषेखालील नंबर | |
| लिंग | पुरुष/स्त्री |
| सभासदास गटातुन वगळल्यास वगळल्याची दिनांक | |
| सभासद प्रकार | गटाचा सभासद / वैयक्तीक लाभार्थी / अध्यक्ष / उपाध्यक्ष / सचिव /खजिनदार |
| सद्यस्थिती | गट सदस्य / गटातुन वगळले / गटात परत घेतले |
| सभासद खाते क्रमांक | |
| व्यवसाय | |
| प्रकार | अल्पभुधारक / अत्यल्पभुधारक / ग्रामिण कारागीर / शेतमजुर |
| साक्षर आहे का? | होय / नाही |
| शिक्षण | |
| अपंगत्व | होय / नाही |
| असल्यास अपंगत्व प्रकार | कर्णबधीर / मूकबधिर / अंध / अस्थिव्यंग / मतिमंद /इतर |
| धर्म | |
| संवर्ग | |
| जात | |
| पोटजात | |
| कुटुंबाचे वार्षीक उत्पन्न | |
| सध्याच्या उद्योगामुळे मिळणारे उत्पन्न | |
| कुटुंबातील सदस्य संख्या | |
| घराचा प्रकार | कच्चे / पक्के |
| इंदिरा आवास योजने अंर्तगत लाभार्थी आहे काय? | होय / नाही |
| घर क्र. | |
| वैयक्तिक स्वच्छता गृह ? | आहे / नाही |
| मुख्य व्यवसाय (Key Activity) | |
| यापूर्वी कर्ज/अनुदान लाभ घेतला आहे का? | होय / नाही |
| असल्यास कोणते ? | वसंतराव नाईक महामंडळ / आण्णाभाऊ साठे महामंडळ /<br>महात्मा फुले मागासवर्गीय महामंडळ / संत रोहीदास विकास महामंडळ<br>पंतप्रधान रोजगार योजना / खादी ग्रामोद्योग महामंडळ/ एकात्मिक ग्रामिण विकास कार्यक्रम /जवाहर/जीवनधारा/दशलक्ष विहीर कार्यक्रम / इतर |
| मुलभुत प्रशिक्षण | होय / नाही |
| कौशल्य वृध्दी प्रशिक्षण | होय / नाही |
| उद्योजकता विकास प्रशिक्षण | होय / नाही |
| विमा उतरवला आहे काय ? | होय / नाही |
| संपर्कासाठी मोबाईल नंबर | |

## वित्तीय संस्था /बँकेचे गटास कर्ज

आजपर्यंत मिळालेल्या कर्जांची माहिती भरावी. एका पेक्षा जास्त कर्ज मिळाली असल्यास प्रत्येक कर्जासाठी स्वतंत्र फॉर्म वापरावा

| | |
|---|---|
| गटाचे नाव | |
| कर्ज प्रकार | खेळते भांडवल / व्यवसाय कर्ज / इतर |
| अर्ज केलेचा दि. | |
| कर्ज | मंजुर / नामंजुर |
| कर्ज वाटप दिनांक | |
| अनुदान वाटप दिनांक | |
| कर्जाचा प्रकार | प्राथमिक / व्दितीय / तृतीय |
| कर्ज उद्देश | |
| व्यवसाय नाव (प्रकल्प) | |
| प्रकल्प किंमत | |
| कर्जाची रक्कम | |
| अनुदान रक्कम | |
| मत्ता तयार दिनांक | |
| एकूण परतफेड केलेली रक्कम | |
| गटास शासनाची व्याजमाफी मिळाली का? | होय / नाही |
| असल्यास किती? | |

## Masters

खालील माहिती जि.ग्रा.वि.यं. ने संपूर्ण जिल्ह्याची संकलीत करून घ्यावी.

| स्वयंसेवी संस्था मास्टर | |
|---|---|
| संस्था नाव | |
| पत्ता | |
| गाव | |
| तालुका | |
| जिल्हा | |
| संबंधित अधिकारी | |
| अध्यक्ष /विश्वस्त | |
| फ़ोन नंबर | |
| इमेल | |

| बॅंक मास्टर | |
|---|---|
| बॅंकेचे नाव | |
| पत्ता | |
| जिल्हा | |
| मॅनेजर | |
| फ़ोन नंबर | |
| बॅंकेचा प्रकार | राष्टीयकृत/ग्रामिण/व्यापारी/सहकारी |

| बॅंक शाखा | |
|---|---|
| शाखा नाव | |
| बॅंक नाव | |
| पत्ता | |
| गाव | |
| तालुका | |
| जिल्हा | |
| मॅनेजर | |
| फ़ोन नंबर | |
| | |

| प्रशिक्षण देणा-या संस्था | |
|---|---|
| संस्थेचे नाव | |
| पत्ता | |
| संपर्क अधिकारी | |
| फ़ोन नंबर | |
| उपलब्ध प्रशिक्षण माहिती | |

| जिल्हा मास्टर | |
|---|---|
| जिल्हा | |
| जि.प. मुख्यालय | |
| विभाग (division) | |
| राज्य | |

| तालुका मास्टर | |
|---|---|
| तालुका | |
| पं.समिती कार्यालय | |
| दा.रेषेवरील लोकसंख्या | |
| दा.रेषेखालील लोकसंख्या | |

| | |
|---|---|
| जिल्हा | |

| **गाव (ग्रामपंचायत) मास्टर** | |
|---|---|
| गावाचे नाव | |
| अंतर्गत वाडी/वस्तीचे नाव (असल्यास) | |
| दा.रेषेवरील लोकसंख्या | |
| दा.रेषेखालील लोकसंख्या | |
| तालुका | |

**टिपः** तालुकानिहाय ग्रामपंचायतीची नावे ( अंतर्भूत गावे / वाडी, वस्तीसहीत.) हि यादी BPL Survey अथवा जनगणना, पुस्तक / CD मध्ये मिळू शकते. किंवा इतर ठिकाणी तयार करुन MS Excel मध्ये द्यावी,

# परिशिष्ट - ड

**संगणक प्रणाली कार्यान्वित करणेसंबंधीत उभयपक्षी जबाबदा-या खालील प्रमाणे राहतील:**

| Responsibility | | L & B | DRDA |
|---|---|---|---|
| Manpower | Project Manager | ✔ | |
| | Site Coordinator | ✔ | |
| | Data Entry | ✔ | |
| | QA/QC | ✔ | |
| | Software Developers | ✔ | |
| | Trainers | ✔ | |
| | System Administrators | | ✔ |
| | Web Administrators | ✔ | |
| Infrastructure | Training Facility including Projectors, White Boards, Markers, Computers etc. | | ✔ |
| Lodging & Boarding | During Implementation | | ✔ |
| | During Training | | ✔ |
| Travel | | ✔ | |
| Hardware | PIV Computer | | ✔ |
| | Internet Connectivity | | ✔ |
| | Printer | | ✔ |
| Software | Operating System: Windows XP | | ✔ |
| | Valid Antivirus | | ✔ |

PUNE- 411037.
Tel: (+91)(020) 6401 8055/ 2421 71 48
Mob: 9422016718
E-mail: lbpune@gmail.com
Website: www.lnbindia.com



| ***Customer Service Report:- DRDA –SHG SGSY Software 3 copies*** | | | |
|---|---|---|---|
| **Customer Details** | **1. BDO/ 2. DRDA/ 3. Leaps and Bounds** | | |
| Offer Doc No. | | Date | |
| Customer Name | DRDA/ Panchayat Samiti | | |
| Address | ZP, | | |
| | | | |
| | | | |
| Contact / Dsg. | | | |
| Telephone (O) | | | |

**VISIT:** SHG Database Management Software **(District/Block:___________________)**
**On request by DRDA:**

Visit Details:

a. Installation Done
b. Demo Given
c. Training Given.
d.

| | Attended by:- Name & Designation | Signature |
|---|---|---|
| 1 | | |
| 2 | | |
| 3 | | |
| 4 | | |
| 5 | | |
| | | |
| | | |
| | | |
| | | |
| | | |
| | | |
| | | |
| | | |
| | | |
| | | |
| | | |
| | | |
| | | |

Remarks by Engineer/Customer: DRDA,
______________________________________________

(L&B Software Engineer) **(Signatory Authority/ BDO)**